टविलें आहे. असा प्रकार पाहतांच बकावलीनें विमान खालीं उतरलें आणि "हें काय चाललें आहे?" असें त्या जमावांतील एकास विचारलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, "हा रूहआफजेच्या आषकाला जाळ-ण्याचा समारंभ चालला आहे." याप्रमाणें त्यांचें भाषण होत आहे तों बकावलीनें बेहेराम वजीरज्याद्यास पाहिलें आणि त्याला आपल्या जवळ बोलाविलें व सर्व वर्तमान विचारलें. जेव्हां त्याजकडून त्या-लाच जाळण्याची तयारी आहे असें बकावलीला समजलें, तेव्हां तिनें त्या जमलेल्या लोकांस हुकूम केला कीं, "पहिल्यानें आग विझवून टाका. जर याच्या एका केंसाला धक्का लागला; तर मी स-र्वांचा प्राण घेईन." असें ऐकतांच सर्वलोक भय पावले व त्यांनीं वजीरज्याद्यास बकावलीच्या हवालीं केलें. नंतर त्यास घेऊन बकावली सर्वांसह एका बागेंत येऊन उतरली आणि शहाज्याद्यास, वजीर-ज्याद्यास आणि दिलबर इत्यादिकांस तेथेंच ठेऊन एकटीच मुज-फ्फरशहा व हुस्नआरा यांजकडे जाऊन त्यांस भेटली. बकावलीला पाहतांच त्या दोघांसही अत्यानंद झाला. नंतर बकावली त्यांस ह्म-णाली—"काका, आज मी तुमच्याकडे येत असतां मार्गांत आमच्या वजीरज्याद्याला तुमचे लोक जाळीत होते, त्यांस मनाई करून मी त्याला सोडविलें आहे. कारण—जरी रागाच्या वेळीं आपण त्याला जाळून टाकण्याची सजा नेमली, तरी विचार करून पाहिलें असतां ती शिक्षा अमलांत आली असती, तर लोकांनीं तुमचा उपहास केला असता. त्यांनीं साफ असें ह्मटलें असतें कीं, शहाज्यादीनें आपल्या आषकाला आपल्याजवळ बाळगून ठेविलें होतें; तें शहास आवडलें नाहीं ह्मणून त्यानें त्याला जाळविलें. हा काय थोडा अपवा-द? जी गोष्ट एक वेळ घडली तीच कायम. ईश्वरानें निर्माण केलेल्या एका चतुर प्राण्याला मारवून तुह्मीं आपल्या कुलाला डाग आणि आपल्या कन्येच्या जिवाला आग लावणार होतां. ती मी अकस्मात

आलें ह्मणून निवारण झाली आहे. तर आतां झालेल्या सर्व अपराधांबद्दल मी तुमच्याजवळ क्षमा मागतें. तो बेहेराम वजीरज्यादा कुलीन, चतुर आणि रुहआफजेला पसंत आहे. या साठीं तुह्मीं आनंदानें त्याची व तिची शादी ( लग्न ) करून आपल्या जिवावरील भार हलका करावा, अशी माझी वारंवार प्रार्थना आहे."

याप्रमाणें बकावलीचें सयुक्तिक भाषण ऐकिल्याबरोबर मुजफ्फर शहा व हुस्नआरा यांचा कोप शांत झाला. त्यांनीं बेहेरामास अभय देऊन बकावली बरोबर इरम येथें पाठविलें आणि फिरोजशहाचे मार्फत रुहआफजा व बेहेराम यांचें मोठ्या थाटानें लग्न केलें. नंतर फिरोजशहा व जमीलाखातुन आणि मुजफ्फरशहा व हुस्नआरा यांचा निरोप घेऊन अपारसंपत्तीसह ताजुल्मुल्क, बकावली, दिलबर, मेहमुदा, महापारा, बेहेराम आणि रुहआफजा हीं सर्व विमानांत बसून सिर्कस्थानासन्निधच्या ताजुल्मुल्काच्या बागांत येऊन राहिलीं. पुढें थोड्याच दिवसांनीं बकावलीनें हम्माला राक्षसीच्या हातून आपल्या बागासमोर दुसरा एक तसाच बाग व महाल तयार करून त्यांत रुहआफजा आणि बेहेराम यांस ठेविलें आणि तीं दोन्हीं कुटुंबें आनंदानें कालक्रमण करूं लागलीं. ईश्वरानें हें चरित्र वाचणारांस सदोदित आनंदांत राखावें! अशी या चरित्रलेखकाची पूर्ण इच्छा आहे, ती जगदात्मा परिपूर्ण करो !!!

